**नाशिक विभागातील महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब**
**<u>मधील अधिका-यांच्या सर्वसाधारण बदल्या/नियुक्त्या</u>**

# महाराष्ट्र शासन

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**

**शासन आदेश, क्रमांक : मविसे १० / २०११ /प्र.क्र. ७४ /आस्था-३अ**

**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**

**दिनांकः- २६ सप्टेंबर, २०११**

**संदर्भः-** शासन आदेश, क्र. मविसे १० / २०११ /प्र.क्र. ४५ /आस्था-३अ, दि.४ ऑगस्ट, २०११.

**<u>आदेश</u> :-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पांडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिका-यांच्या बाबतीत कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या पूर्वमान्यतेने नाशिक विभागातील महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील एकूण १२ अधिकाऱ्यांच्या बदल्या संदर्भाधिन दिनांक ४ ऑगस्ट, २०११ च्या आदेशान्वये करण्यात आल्या आहेत. <u>सदर आदेशातील अनु.क्र.२ व ३ येथील अधिकारी अनुक्रमे श्री.एम.यु.कोर, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, नांदगांव, जि.नाशिक व श्री.आर.ए.देशमुख, बाल विकास प्रकल्प अधिकारी, निफाड, जि.नाशिक यांच्या आपापसात करण्यात आलेल्या बदलीस या आदेशाद्वारे स्थगिती देण्यात येत आहे.</u> दिनांक ४ ऑगस्ट, २०११ च्या आदेशात इतर काही बदल नाहीत.

२. कृपया संबंधित अधिकारी यांनी याची नोंद घ्यावी. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी वरील आदेशाच्या अनुषंगाने योग्य ती नोंद घेऊन उचित ती कार्यवाही तात्काळ करावी.

३. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९२६१७३८०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रि. इ. शेख )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति

१. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजना संचालनालय, पुणे.
२. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
३. मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, नाशिक
४. महालेखापाल- १ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
**५. संबंधित अधिकारी द्वारा मु.का.अ.जि.प यांचे मार्फत**
६. मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
८. मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
९. कार्यासन क्रमांक : आस्था - २, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०. निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३अ ), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.